**कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प संच क्र. ६ च्या सुधारीकरणास व आधुनिकीकरणासाठी महानिर्मिती कंपनी मर्यादित यांना प्राप्त झालेल्या अनुदानाच्या रक्कमेच्या समायोजनाबाबत वित्तीय वर्ष २०१९-२०**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. पुरमा-२०१९/प्र.क्र.३५/ऊर्जा-३**
मंत्रालय मुंबई ४०० ०३२
दिनांक : - १० ऑक्टोंबर, २०१९

**संदर्भ** : - १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि.८ जुलै,२०१९
२) महानिर्मिती कंपनीचे पत्र क्र. CMD/MSPGCL/GOM/No.४८८६, दि.१५ मे, २०१९
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८ जुलै, २०१९

**प्रस्तावना : -**

कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प संच क्र. ६ (आधुनिकीकरण व नूतनीकरण ) जागतिक बँकेच्या सहकार्याने उभारण्यात येत आहे. सदर प्रकल्पासाठी सन २०१९-२० या वर्षाकरिता मागणी क्र. के-६ योजना सांकेतांक २८०१२८७६ अंतर्गत पावसाळी अधिवेशनामध्ये रू. २२.४४ लाख पुरवणी मागणी मंजूर झाली आहे.

सदर मंजूर पुरवणी मागणीच्या अनुषंगाने जागतिक बँकेकडून महानिर्मिती कंपनीस केंद्र शासनामार्फत मंजूर झालेली व राज्याच्या एकत्रित निधीत जमा झालेली अनुदानाची रक्कम रु. २२,४४,०००/- (रूपये बावीस लाख चवेचाळीस हजार फक्त ) महानिर्मिती कंपनीस रोखीने वितरित न करता जलसंपदा विभागास महानिर्मिती कंपनीकडून भाडेपट्टीपोटी देय असलेल्या रक्कमेच्या अनुषंगाने पुस्तकी समायोजनाने वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

महानिर्मिती कंपनीचा कोराडी युनिट क्र. ६ (आधुनिकीकरण व नुतनीकरण) हा प्रकल्प केंद्र शासनाच्या पुढाकाराने जागतिक बँकेच्या अर्थसहायाने उभारण्यात आलेला आहे. त्या अनुषंगाने जागतिक बँकेकडून महानिर्मिती कंपनीस मंजूर व राज्याच्या एकत्रित निधीत जमा झालेली अनुदानाची रक्कम रु. २२,४४,०००/- (रूपये बावीस लाख चवेचाळीस हजार फक्त ) इतकी रक्कम महानिर्मिती कंपनीस रोखीने वितरीत न करता पुस्तकी समायोजनाने खाली नमूद लेखाशिर्षाखाली समायोजित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. “मागणी क्र. के-६ २८०१ वीज,०५ पारेषण व वितरण,१९९ अशासकीय संस्थाना सहाय्य,(००),(००) (०१) एमएसपीजीसीएल ला कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प संच क्र.६ च्या नुतनीकरणासाठी व आधुनिकीकरणासाठी सहाय (२८०१२८७६)३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून (पूरवणी मागणीमधून) समायोजित करण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आली आहे त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

४. वरील मंजूर अनुदानाची रक्कम महानिर्मिती कंपनीस रोखीने वितरीत न करता खाली दर्शविल्याप्रमाणे महानिर्मिती कंपनीकडून जलसंपदा विभागास देय असलेल्या भाडेपट्टीच्या रक्कमेपाटी वसूल करण्यात यावी आणि खाली नमूद केलेल्या जमा लेखाशिर्षाखाली पुस्तकी समायोजनेव्दारे समायोजित करण्यात यावी.

| अ. क्र. | तपशिल | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १ | वित्तीय वर्ष २०१९-२० या वर्षातील जागतिक बँकेच्या अनुदानाच्या रक्कमेपोटी समायोजित करावयाची रक्कम | २२,४४,०००/- | ०८०१ वीज २२ इतर जमा रक्कमा २२ (०१) इतर जमा रक्कमा महाराष्ट्र राज्य वीज मंडळाकडून येणारी भाडेपट्टीची रक्कम (०८०१०१६३) |
| | **एकूण** | **२२,४४,०००/-** | |

५. सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई यांच्या अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने या रक्कमेचे देयक तयार करण्यात येवू नये.

६. सदर देयकाच्या समायोजनासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (ऊर्जा-३) व नियंत्रण अधिकारी म्हणून सह सचिव (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेता / लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात रक्कम रु. २२,४४,०००/- (रूपये बावीस लाख चवेचाळीस हजार फक्त ) चे पुस्तकी समायोजन करुन तसे शासनास कळवावे.

८. महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०१९/निधी वितरण/शासन परिपत्रक क्र. अर्थसंकल्प, २०१९ / प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८/०७/२०१९ च्या सोबतच्या परिशिष्टामधील अनुक्रमांक-५ या अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. उर्वरित अटी लागू होत नाही.

९. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ३५३/१४६१, दिनांक ३०.०५.२०१९ त्याचप्रमाणे वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १२३/१९/व्यय-१६, दिनांक ०६.०६.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१९१०१०१५४७००१३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nanasaheb Rajaram Dhane

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, serialNumber=6c39e2858150dbdfcfe6cd25ed08adf59f4d2fd8c1ede1730735f604904bf3bb, cn=Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2019.10.10 15:51:22 +05'30'

**(ना. रा. ढाणे)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत -:**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विदयुत सुत्रधारी कंपनी मर्यादित, हॉंगकॉंग बिल्डींग,४ था मजला ,एम.जी .रोड, फोर्ट, मुंबई-२
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई-४०००२०.
४) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई-४०००२०.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -२, नागपूर.
६) मा. विरोधी पक्ष नेता,विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ,मुंबई,
७) उप सचिव, (जसव्य व लाक्षेवि) जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
८) मुख्य अभियंता, (विद्यत) जलविद्युत प्रकल्प यांचे कार्यालय, एचएसबीसी इमारत, ४ था मजला, एम.जी. रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
९) अधिदान व लेखा अधिकारी, (अराप / रालेवि-१), मुंबई.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती /साऊ / व्यय-१६, ऋण व हमी कार्यासन) मंत्रालय, मुंबई, ३२
१२) अवर सचिव (ऊर्जा-४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.